# ॥ श्री गणेशपञ्चकम् ॥



॥ श्रीगणेशाय नमः ॥

नागेशं करुणालयं शिवसुतं योगेश्वरं धीधवम्।
कैलासाभरणं पुराणपुरुषं कैवल्यधामस्थितम् ॥
विघ्नेशं प्रथमं हरिं गजमुखं ॐकारबीजात्मकम्।
वन्देऽहं गिरिजात्मजं गणपतिं ह्यभ्यन्तराधिष्ठितम् ॥ १ ॥

मायाब्रह्म तथैव सर्व जगतां मेधापते हीश्वर।
व्यक्ताव्यक्तमिदं चराचरयुतं त्रैलोक्यरूपं च ते ॥
वेदात्मा मुनिरीश्वरः कविवरो व्यासप्रियं दैवतम्।
वन्देऽहं गिरिजात्मजं गणपतिं ह्यभ्यन्तराधिष्ठितम् ॥ २ ॥

नासाग्रे नयने प्रसन्नवदनं तीक्ष्णं च कर्णद्वयम्।
कट्यां संयमसर्पबद्धवसनं पद्मासनस्थो हरिः ॥
विश्वेशं द्विभुजं सदा शुभकरं नारायणं श्रीगुरुम्।
वन्देऽहं गिरिजात्मजं गणपतिं ह्यभ्यन्तराधिष्ठितम् ॥ ३ ॥

धीदेवो गुणवांस्तथैव गतिमान्स्कन्दानुजो वीर्यवान्।
ज्ञानं मोक्षकरं दशाशुभहरं लम्बोदरे संस्थितम् ॥
तेजः सूर्यगतं  सुधाकरजलं यस्य कृपा जीवनम्।
वन्देऽहं गिरिजात्मजं गणपतिं ह्यभ्यन्तराधिष्ठितम् ॥ ४ ॥

नादं चण्डसुनर्तनं च कुरुते मोरेश्वरो रुद्रजः।
हत्वा दैत्यकुलं गजेन्द्रवदनो धर्मप्रभू  रक्षकः ॥
मित्रः सर्वतमान्धकारहरणं ज्ञानं प्रयच्छ प्रभो।
वन्देऽहं गिरिजात्मजं गणपतिं ह्यभ्यन्तराधिष्ठितम् ॥ ५ ॥
- डॉ. पुष्कराज उदय वर्तक

( जो ) गजराज, करुणानिधान, शिवसुत आहे, योगेश्वर आहे, बुद्धीचा पती आहे; कैलासाचे भूषण, पुराणांत वर्णन केलेला पुरुष, मोक्षधामी राहणारा; विघ्नेश, प्रथम पूजनीय, श्रीहरी, गजवदन, ॐकारबीजात्मक आहे; ( त्या प्राणिमात्रांच्या )अंतस्थ ( एवं अंतरंगाचा प्रशासक ) असलेल्या पार्वतीपुत्र गणपतीला मी वंदन करतो / करते. ॥ १ ॥

हे मायाब्रह्मस्वरूप ! हे मेधापति ! हे ईश्वर ! विविध प्रकारचे ( वर्तमानात ) व्यक्त ( आणि भविष्यातील पण सध्या ) अव्यक्त असे ( प्रत्येक जीवमात्राच्या शरीरां ची क्षणाक्षणाला मृत्यू होवून नव्याने उत्पत्ती होत असते ), चर-अचर यांनी युक्त असे तीनही लोक , तूच आहेस. तू मुनींचा तसेच कवींचा ( त्यांच्यासाठी ) वेदांचा आत्मा ( असलेला असा ), व्यासांचे प्रिय दैवत आहेस . ( त्या प्राणिमात्रांच्या ) अंतस्थ ( एवं अंतरंगाचा प्रशासक ) असलेल्या पार्वतीपुत्र गणपती असलेल्या तुला मी वंदन करतो / करते. ॥ २ ॥

ज्याची नजर नासाग्राकडे आहे, प्रसन्नमुख आहे, तीक्ष्ण असे दोन्ही कान आहेत; कमरेला संयमाचे प्रतीक असलेल्या सर्पाने बांधलेले वस्त्र आहे ; पद्मासनस्थ हरी आहे; जो विश्वेश, दोन हात असलेला नारायणस्वरूप श्रीगुरु आहे; ( त्या प्राणिमात्रांच्या )अंतस्थ ( एवं अंतरंगाचा प्रशासक ) असलेल्या पार्वतीपुत्र गणपतीला मी वंदन करतो/ करते. ॥ ३ ॥

जो बुद्धीचा देव, गुणवान, तसेच गतिमान असा कार्तिकेयाचा धाकटा बंधू, पराक्रमी आहे; दहा प्रकारे अशुभ हरण करणारे आणि मोक्ष करणारे ज्ञान ज्याच्या विशाल उदरीं स्थित आहे; सूर्याचे तेज, सागराचे जल आणि ( हे अवघे ) आयुष्य ज्याची कृपा आहे ; ( त्या प्राणिमात्रांच्या )अंतस्थ ( एवं अंतरंगाचा प्रशासक ) असलेल्या पार्वतीपुत्र गणपतीला मी वंदन करतो / करते. ॥ ४ ॥

(सर्व युगांत निरनिराळ्या रूपांनी) दैत्यकुळाचा संहार करून धर्माचा रक्षक असा राजा गजवदन, मोरेश्वर रुद्रसुत प्रचंड आवाज आणि ( अग्नीसमान ) उष्ण असे उत्तम नृत्य करतो. ( तो ) सूर्य (आहे). हे प्रभो ! सर्व तमाच्या ( सत्त्व-रज-तम यातील तम हा गुण ) अंधकाराचा नाश करणारे ज्ञान प्रदान कर. ( त्या प्राणिमात्रांच्या ) अंतस्थ ( एवं अंतरंगाचा प्रशासक ) असलेल्या पार्वतीपुत्र गणपती असलेल्या( तु )ला मी वंदन करतो / करते. ॥ ५ ॥